**विधानमंडळ/संसद सदस्यांना सन्मानाची व सौजन्याची वागणूक देण्याबाबतच्या मार्गदर्शक तत्वांसदर्भातील दिनांक २७ जुलै, २०१५ च्या परिपत्रकातील परिच्छेद क्रमांक ७ (ii) मधील "माहिती" या शब्दाची व्याख्या स्पष्ट करण्याबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक: विमंस २०१७/प्र.क्र.२६/कार्या १८ (र.व का.)**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- १४ फेब्रुवारी, २०२०.

वाचा :- (१) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक :- विमंस २०१३/प्र.क्र.६७/ १८ (र.व का.), दिनांक २७ जुलै,२०१५.
(२) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक:- विमंस २०१३/प्र.क्र.२६/ १८ (र.व का.), दिनांक ०५ डिसेंबर,२०१७.

**प्रस्तावना :-**

विधानमंडळ/ संसद सदस्यांना सन्मानाची व सौजन्याची वागणूक देण्याबाबत उक्त संदर्भ क्र. १ येथील दिनांक २७ जुलै, २०१५ रोजीच्या शासन परिपत्रकातील परिच्छेद क्रमांक ७ (ii) अनुसार मंत्रालयीन विभाग, विभाग प्रमुख आणि कार्यालय प्रमुख यांचेकडे विधानमंडळ सदस्य यांनी त्यांची संसदीय कामकाजविषयक कर्तव्ये पार पाडण्यासाठी जनतेच्या कल्याणविषयक बाबींसंबंधीच्या माहितीची मागणी केल्यास सदरची माहिती त्यांना पुरविण्यात यावी, असे निदेश देण्यात आले आहेत. तथापि, यासंदर्भात मा.विधानमंडळ सदस्यांना माहिती पुरविताना नेमक्या कोणत्या स्वरुपातील माहिती देणे अपेक्षित आहे. सदर "माहिती" या शब्दाच्या परिभाषेमध्ये एखाद्या धारीकेची छायांकीत प्रत देणे अपेक्षित आहे किंवा कसे, याबाबत अनेक मंत्रालयीन विभागांकडून अनौपचारीक संदर्भान्वये वारंवार विचारणा करण्यात येत असते. या मागणीच्या अनुषंगाने मा.मुख्य सचिव महोदयांचे निदेशानुसार उक्त संदर्भ क्र.२ येथील दिनांक ०५ डिसेंबर,२०१७ रोजीच्या शासन परिपत्रकान्वये दिनांक २७ जुलै,२०१५ रोजीच्या शासन परिपत्रकातील परिच्छेद क्रमांक ७ (ii) मधील सूचनेसंदर्भात **"माहिती "** या शब्दात अंतर्भूत असलेल्या बाबी स्पष्ट करण्यासाठी अपर मुख्य सचिव (गृह) यांच्या अध्यक्षतेखाली समितीची स्थापना करण्यात आली होती. या समितीच्या दिनांक २५ जानेवारी,२०१९ रोजी झालेल्या बैठकीमध्ये समितीने दिनांक २७ जुलै, २०१५ रोजीच्या शासन परिपत्रकातील परिच्छेद क्रमांक ७ (ii) मधील "माहिती " या शब्दात अंतर्भूत असलेल्या बाबी स्पष्ट करण्यासंदर्भात अहवाल शासनास सादर केला आहे.

२. उक्त परिच्छेदामध्ये नमूद केलेले मुद्दे विचारात घेऊन या विभागाच्या उक्त संदर्भ क्र. १ येथील दिनांक २७ जुलै, २०१५ रोजीच्या शासन परिपत्रकातील परिच्छेद क्रमांक ७ (ii) मधील सूचनेसंदर्भात "माहिती" या शब्दात अंतर्भुत असलेल्या बाबी स्पष्ट करण्यासाठी स्वयंस्पष्ट शासन परिपत्रक निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन परिपत्रक :-

विधानमंडळ/संसद सदस्यांना सन्मानाची व सौजन्याची वागणूक देण्याबाबत या विभागाने उक्त संदर्भ क्र. १ येथील दिनांक २७ जुलै,२०१५ रोजीच्या शासन परिपत्रकातील परिच्छेद क्रमांक ७ (ii) अनुसार संसद सदस्य/विधान मंडळ सदस्य यांना माहिती देताना माहितीचा अधिकार अधिनियम, २००५ मधील कलम ८ (१) मध्ये माहिती प्रकट करण्याबाबत नमूद करण्यात आलेले अपवाद वगळता कलम २ (च) ("माहिती" या शब्दाची व्याख्या) व कलम २ (झ) ("अभिलेख" या शब्दाची व्याख्या) मधील तरतूदी विचारात घेऊन इतर सर्व "माहिती" संसद सदस्य / विधानमंडळ सदस्य यांना विनामुल्य देण्यास हरकत नाही.

२. सर्व मंत्रालयीन विभाग तसेच त्यांच्या अधिनस्त सर्व कार्यालयांनी मा. विधानमंडळ सदस्य तसेच मा. संसद सदस्य यांनी त्यांची संसदीय कामकाजविषयक कर्तव्ये पार पाडण्यासाठी जनतेच्या कल्याण विषयक बाबींच्या माहितीची मागणी केल्यास ती देताना उपरोक्त सूचनेचे काटेकोरपणे पालन करावे.

३. वरीलप्रमाणे संदर्भ क्र.१ येथे नमूद परिपत्रकातील परिच्छेद क्रमांक ७ (ii) बाबतचे स्पष्टीकरण निर्गमित झालेले असल्याने, संदर्भ क्र.२ येथील परिपत्रकान्वये अ.मु.स.(गृह) यांच्या अध्यक्षतेखाली गठित करण्यात आलेली समिती या अन्वये विसर्जित करण्यात येत आहे.

४. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून, त्याचा संगणक सांकेतांक २०२००२१४१२४४४६८२०७ असा आहे. तसेच सदर परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

AJOY MEHTA

Digitally signed by AJOY MEHTA
DN: c=IN, st=Maharashtra,
2.5.4.20=6cd985f04d38fef505754856131307df708dca9bbcea90df80882d2257d79126, postalCode=400032,
street=MANTRALAYA,MUMBAI,
serialNumber=85c1fa2cdc7cf754bc479fb6ae97bc65889de163fa7e4c775fec1ed9e37334f3, ou=NA,
o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=AJOY MEHTA
Date: 2020.02.15 16:02:21 +05'30'

**( अजोय मेहता )**
**मुख्य सचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा.विरोधी पक्षनेता, विधान परिषद/विधान सभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
२) सर्व सन्माननीय विधानसभा , विधानपरिषद व संसद सदस्य,
३) मा.राज्यपालांचे सचिव (५ प्रती),
४) मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव (५ प्रती),
५) सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव/स्वीय सहायक,
६) मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहायक,

७) मा.महाअधिवक्ता, महाराष्ट्र राज्य,
८) सर्व अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/सचिव, मंत्रालयीन प्रशासकीय विभाग
९) प्रबंधक, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई,
१०) प्रबंधक, उच्च न्यायालय, मूळ शाखा, मुंबई,
११) प्रबंधक, लोकायुक्त व उपलोकायुक्त यांचे कार्यालय,
१२) सचिव, राज्य निवडणूक आयोग, मुंबई,
१३) सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
१४) प्रधान सचिव, विधानमंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई,
१५) मुख्य माहिती आयुक्त, राज्य माहिती आयोग, मुंबई,
१६) राज्य मुख्य सेवा हक्क आयुक्त, राज्य सेवा हक्क आयोग, मुंबई,
१७) सर्व विभागीय आयुक्त,
१८) सर्व जिल्हाधिकारी,
१९) सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
२०) सर्व मंत्रालयीन विभागांच्या अधिपत्याखालील सर्व विभाग प्रमुख/प्रादेशिक प्रमुख/कार्यालय प्रमुख,
२१) महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई (५ प्रती),
२२) सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,
२३) निवड नस्ती